GR २००४०९२११२३९२५००१-०३००

**शासकीय कामासाठी तसेच जिल्हा परिषदांच्या कामासाठी गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणेबाबत.**

(२८)

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
निर्णय क्रमांक: गौखनि १०८८/४३३/३५९२/ख
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १८ ऑक्टोबर, २००१

वाचा :- १)शासन निर्णय, उद्योग व सहकार विभाग क्रमांक एमएनएल-२१५९-एमएनजी, दि.१९.८.१९५९

२)शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग क्रमांक-एमएनएल-२१५९-एमएनजी, दि.१४.७.१९६०

३)शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग क्रमांक-एमएनएल-२१५९/३८०५३, एमएनजी, दि.११.१२.१९६४

४)शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग क्रमांक-एमएमआर-२१६७/६६४०४/एमएनजी, दि.२८.९.१९६८

५)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर-२१६९/१५४०-ब, दि.८.१२.१९७०

६)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर २१६७/६८५३५/बी, दि.२८.२.१९७३

७)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर-१०७२/७०५७/ग-६, दि.१०.२.१९७६

८)शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर-३३७६/१९६८२/(८७)/ग-७, दि.२.८.१९७७

९)शासन ज्ञापन, महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर-१०८०/१२२९/९६३/ग-७, दि.२९.७.१९८०

१०)शासन परिपत्रक क्रमांक महसूल व वन विभाग क्रमांक-एमएमआर -३९८० /३७३३ /१००६ /ग-७, दि.१०.१२.१९८१

११)शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांक एमएमआर-१०८३/२०/१७७१/ग-७, दि.२१.२.१९८३.

१२)शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांक गौखनि -१०९७/२३२/ख, दि.५.१.१९९८

## शासननिर्णय

शासकीय कामासाठी पाटबंधारे विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांच्या कामासाठी, जिल्हा परिषदांच्या कामासाठी व सिडकोच्या कामासाठी तसेच महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास लागणा-या गौण खनिजावरील स्वामित्वधन न भरता व ठराविक अनामत रक्कम भरुन गौण खनिज उत्खननास परवानगी देण्याची पध्दत सध्या अस्तित्वात आहे. तथापि या पध्दतीचा दुरुपयोग करुन कॉन्ट्रॅक्टर उत्खनन केलेल्या गौण खनिजाचा वापर शासकीय, जिल्हा परिषद व सिडकोच्या कामाव्यतिरिक्त इतर कारणास्तव करतात असे निदर्शनास आले आहे.

२. प्रचलित शासकीय धोरणांचा गैर फायदा शासकीय कंत्राटदार घेतात हे लक्षात घेता, शासनाचे नुकसान टाळण्यासाठी, शासकीय कंत्राटदारांनी इतर व्यक्तीप्रमाणेच राजशुल्क भरणे योग्य ठरेल असे मत वेळोवेळी जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्तांनी व्यक्त केले आहे. गौण खनिजासंबंधीच्या प्रश्नांचा अभ्यास करण्यासाठी नेमण्यात आलेल्या समितीने (मोदी समितीने) उपरोक्त मुद्दयावर सखोल अभ्यास करुन अस्तित्वात असलेल्या पध्दतीमुळे (शासकीय /जिल्हा परिषद/सिडकोच्या कामासाठी स्वामित्वधन न भरता परवानगी देण्याची पध्दत ) शासनाचे राजशुल्काचे नुकसान होऊ नये म्हणून सदर पध्दत रद्द करण्यात यावी अशी शिफारस केली आहे. या शिफारशीस शक्तीप्रदत्त (High Power Committee) समितीने मान्यता दिली आहे.

३. नैसर्गिकरित्या तयार होणा-या साधन संपत्तीचे (गौण खनिजाचे) अनधिकृत वापर टाळण्यासाठी तसेच शासनाचे आर्थिक नुकसान टाळण्यासाठी, शासकीय कामासाठी, पाटबंधारे विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या कामासाठी

तसेच जिल्हा परिषदेच्या कामासाठी, सिडकोच्या व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या कामासाठी,लागणा-या गौण खनिजावर राजशुल्क न घेता गौण खनिज उत्खननाची परवानगी देण्याची सध्याची पध्दत बंद करणे आवश्यक आहे. तरी या संदर्भात शासकीय, जिल्हा परिषद व सिडकोच्या व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या कामासाठी राजशुल्क न घेता गौण खनिज देण्यासंबंधी यापूर्वी काढण्यात आलेले सर्व आदेश या आदेशान्वये रद्द करण्यात येत असून शासकीय, जिल्हा परिषदेच्या, सिडकोच्या व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या कामासाठी लागणा-या गौण खनिजांवर प्रचलित गौण खनिज उत्खनन नियमांच्या तरतुदीनुसार राजशुल्क आकारण्यात यावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने (त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र. ७४२/२००१/व्यय -९, दिनांक २६ जून, २००१ अन्वयें) निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

(अरविंद चौधरी)
सह सचिव
महसूल व वन विभाग.

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सार्वजनिक बांधकाम विभाग आणि पाटबंधारे विभागातील सर्व अधिक्षक अभियंता.
सार्वजनिक बांधकाम विभाग आणि पाटबंधारे विभागातील सर्व कार्यकारी अभियंता.
मुख्य कार्यकारी अधिकारी, सिडको, नवी मुंबई, वाशी.
सर्व वनसंरक्षक,
साखर संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे-९
आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई.
आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर .
आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर.
प्रशासक, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
प्रशासक, कल्याण महानगरपालिका, कल्याण.
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी.
महालेखापाल,महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
नगरविकास विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२.
वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२.
उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
व्यापार वाणिज्य व खनिकर्म विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२.
कृषि पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
महसूल व वन विभागातील, ज-१,ज-२,ज-३,ज-४,ज-५,ज-६,ज-७ कार्यासने
निवडनस्ती, ख कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

र्व-७९६(१००० -१०-०१) →—